**प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियानांतर्गत "किमान कौशल्य विकास कार्यक्रम" या जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेच्या अंमलबजावणीच्या कार्यपद्धतीमध्ये सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१५/प्र.क्र.५६/अभियान-१**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ जानेवारी, २०१९.

**वाचा :** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक जिवायो १००७/प्र.क्र.३९/का-१४४४, दिनांक १६ फेब्रुवारी, २००८.
२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१५/प्र.क्र.१९५/रोस्वरो-१, दिनांक ०३ ऑगस्ट, २०१५.
३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१५/प्र. क्र.१२२/रोस्वरो-१, दिनांक ०२ सप्टेंबर, २०१५.
४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१५/प्र.क्र.३७/अभि-१, दिनांक २३ नोव्हेंबर, २०१५.
५) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१५/प्र.क्र.५६/अभि-१, दिनांक १६ मार्च, २०१७.

**प्रस्तावना :**

राज्यातील युवक-युवतींचे कौशल्य विकासाद्वारे सक्षमीकरण करुन त्यांना अधिक मागणी असलेल्या उद्योग, सेवा व तत्सम क्षेत्रात रोजगार/स्वंयरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देण्यासाठी प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान राबविण्यास या विभागाच्या दिनांक ०२ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील अ.क्र.९.२ मधील तरतुदीच्या अनुषंगाने जिल्हयातील विशिष्ट भोगोलिक तथा सामाजिक स्थिती, परंपरागत व्यवसाय, नैसर्गिक संसाधन तथा साधनसामुग्री इत्यादींच्या आधारे जिल्हयातील रोजगार/ स्वयंरोजगारासाठी अधिक मागणी असलेली क्षेत्रे निश्चित करून या क्षेत्रांच्या कौशल्याच्या मागणीनुसार विशिष्ट अभ्यासक्रम राबविणे तसेच प्रशिक्षणप्राप्त उमेदवारांना रोजगार/स्वयंरोजगारासाठी सहाय्य करणे या उद्दिष्टाकरिता "**किमान कौशल्य विकास कार्यक्रम**" या जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेस या विभागाच्या दिनांक १६ मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून सदर शासन निर्णयान्वये योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे.

प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीच्या दृष्टीने दिनांक १६ मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयात विहित केलेल्या योजनेच्या अंमलबजावणीच्या कार्यपद्धतीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीच्या दृष्टीने किमान कौशल्य विकास कार्यक्रम संदर्भातील विभागाच्या दिनांक १६ मार्च, २०१७ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ३ खालीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.

"३. जिल्हा स्तरावर किमान कौशल्य विकास कार्यक्रम राबविण्याकरिता प्रशिक्षण संस्थांची निवड खालील पद्धतीने करता येईल.

१) जिल्हा कौशल्य विकास कार्यकारी समितीद्वारे अभ्यासक्रमाचे नांव व प्रशिक्षणार्थ्यांची संख्या महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीस ऑनलाईन कळविण्यात येईल.

२) सदर अभ्यासक्रम राबविण्याकरिता संबंधित जिल्ह्यात सूचिबद्ध असलेल्या संस्थांची प्रवेश क्षमता विचारात घेऊन प्रशिक्षणार्थ्यांना प्रशिक्षण देण्याकरिता आवश्यक प्रशिक्षण संस्थांची यादी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीद्वारे जिल्हा कौशल्य विकास कार्यकारी समित्यांना ऑनलाईन उपलब्ध करुन देण्यात येईल.

३) जिल्हा कौशल्य विकास कार्यकारी समितीने निवड केलेले अभ्यासक्रम राबविण्याकरिता आवश्यक प्रशिक्षण संस्था महाराष्ट्र कौशल्य विकास सोसायटीकडे सूचिबद्ध नसल्यास तसे महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीद्वारे जिल्हा कौशल्य विकास कार्यकारी समितीस ऑनलाईन कळविण्यात येईल.

४) महाराष्ट्र कौशल्य विकास सोसायटीकडे सूचिबद्ध संस्था उपलब्ध नसल्यास जिल्हा कौशल्य विकास कार्यकारी समितीद्वारे इच्छूक संस्थांकडून इरादापत्र (EoI) मागविण्यात येईल. इरादापत्रामध्ये इच्छूक कौशल्य प्रशिक्षण संस्थेने प्रशिक्षण खर्चाच्या प्रतिपूर्तीचे दर नमूद करणे तसेच सदर दर हे कौशल्य विकास व उद्योजकता विभागाने वेळोवेळी निश्चित केलेल्या दराच्या मर्यादेत असणे आवश्यक राहील. सदर दरामध्ये उमेदवारांचे परिचालन (Mobilization), समुपदेशन, मार्गदर्शन, प्रशिक्षण, उमेदवारांना रोजगार/स्वयंरोजगार उपलब्ध करुन देऊन तद्नंतरचा पाठपुरावा इत्यादी बाबींचा समावेश असेल.

५) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१५/प्र.क्र.३७/ अभि.१, दिनांक २३/११/२०१५ मधील निकषांची पूर्तता करणाऱ्या सुयोग्य संस्थांची निवड जिल्हा कौशल्य विकास कार्यकारी समितीद्वारे करण्यात येईल. निवड केलेल्या प्रशिक्षण संस्थांनी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीकडे सूचीबद्ध होणे बंधनकारक राहील."

२. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ७५/१४८१-नि.वि., दिनांक २६/१२/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३.   सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२११५३४३८२८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Wasudev Gawande

Digitally signed by Gajanan Wasudev Gawande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development And Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=598b4111a7392ee0c9038cf4c426c1f9ef65d75e9ac67ec77c38a9c5895cc932, serialNumber=92cce2bddffe9d1b98d5b31109f5f81e224273580cfca2f478d921078212cf69, cn=Gajanan Wasudev Gawande
Date: 2019.01.21 15:36:32 +05'30'

**( गजानन वा. गावंडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री  यांचे प्रधान सचिव,
२. सर्व मा.मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई,
५. सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मा.मुख्य सचिव, मंत्रालय , मुंबई,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे  अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, कफ परेड, मुंबई,
१०. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१, महाराष्ट्र, मुंबई,
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा) -२, महाराष्ट्र, नागपूर,
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/सर्व जिल्हा कोषागार कार्यालय
१६. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७. सर्व विभागीय आयुक्त,
१८. सर्व जिल्हाधिकारी,
१९. सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती,
२०. आयुक्त सर्व महानगरपालिका,
२१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२२. मुख्याधिकारी, सर्व नगर परिषद/नगर पंचायती,
२३. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय  शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२४. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
२५. उपसंचालक, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, विभागीय मुख्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
२६. सर्व सहाय्यक संचालक, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता
२७. सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
२८. निवड नस्ती.